**नगरपरिषद प्रशासनाच्या कामकाजासाठी आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एमसीओ-२०१४/प्र.क्र.९१/नवि-१४**
मंत्रालय (मुख्य इमारत), चौथा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २८ जुलै, २०१५

वाचा :-

१) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.:- एमसीओ-२०१४/प्र.क्र.९१/नवि-१४, दि.२८.०८.२०१४
२) नगर विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. एमसीओ-२०१४/प्र.क्र.९१/नवि-१४, दि.११.०२.२०१५
३) महसूल व वन विभागाची अधिसूचना क्र.प्राफेब ११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि.३१.०७.२०१४
४) नगर विकास विभाग शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१४/प्र.क्र.११४/नवि-१४, दि.१०.०६.२०१५

**प्रस्तावना :-**

उपरोक्त क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विभाग स्तरावर विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक , कोकण / पुणे/ नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर यांच्या कार्यालयातील सहाय्यक प्रादेशिक संचालक, गट-ब यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात आलेले आहे. तसेच, जिल्हा स्तरावर नगरपरिषद प्रशासनाच्या कामकाजासाठी राज्यातील ३३ जिल्ह्यांसाठी जिल्हाधिकारी कार्यालयातील जिल्हा प्रशासन अधिकारी- नगर विकास शाखा श्रेणी-१/ श्रेणी-२ यांना कार्यालय प्रमुख व त्या कार्यालयाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आलेले आहेत.

उपरोक्त क्र.३ येथील अधिसूचनेद्वारे पालघर जिल्ह्याची दि.०१.०८.२०१४ पासून नव्याने निर्मिती झालेली आहे. नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी जिल्हाधिकारी कार्यालयात, नगरपरिषद प्रशासन संचालनालयांतर्गत जिल्हा प्रशासन अधिकारी, श्रेणी-२ संवर्गाचे एक पद दि.०१.०७.२०१५ पासून उपरोक्त क्र.४ अन्वये निर्माण करण्यात आलेले आहे.

नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी जिल्हा स्तरावर नगरपरिषद प्रशासनाच्या कामकाजासाठी कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी जिल्हा स्तरावर नगरपरिषद प्रशासनाच्या कामकाजासाठी जिल्हाधिकारी कार्यालयातील जिल्हा प्रशासन अधिकारी- नगर विकास शाखा श्रेणी-२ यांना कार्यालय प्रमुख व त्या कार्यालयाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.०५.२००९ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.२४.०६.२००९ अन्वये आहरण व संवितरण अधिकारी संकेतांक प्रदान करावयाची संगणकीकृत कार्यपध्दती विहीत केलेली आहे. त्यानुसार, आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी आवश्यक ती पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२८११५२३०७३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=UDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2015.07.28 11:56:34 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालस, वरळी, मुंबई
७. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, कोकण विभाग
८. जिल्हाधिकारी पालघर
९. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१०.सहसंचालक (तांत्रिक), लेखा व कोषागारे संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन,५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
११.जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर जिल्हा
१२.सहाय्यक प्रादेशिक संचालक, विभागीय आयुक्त कार्यालय , कोकण विभाग
१३.जिल्हा प्रशासन अधिकारी, श्रेणी-२, जिल्हाधिकारी कार्यालय, पालघर
१४.नगर विकास विभाग, मंत्रालय, सर्व कार्यासने
१५.निवडनस्ती (नवि-१४)